नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता अनुदान उपलब्ध नसल्याने पुरवणी मागणीद्वारे अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१४ /प्र.क्र.२०४/ई-८,**

३२ वा मजला, सेंटर-१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई- ४०० ००५.
तारीख: ११ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१४/प्र. क्र.१३५/ई-८, दिनांक ३१/०७/२०१४.

२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांचे क्र. लेखामेळ-१००१४/१/२०१४, दि. १७ ऑक्टोबर, २०१३ चे पत्र.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०१४/प्र. क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि.०१/०१/२०१५.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. पूरक-२०१५/प्र. क्र. ०७/ब-१, दिनांक ०७/०१/२०१५.

**प्रस्तावना:-**

शासनाने दि.०१/०८/२०१४ रोजी पालघर जिल्ह्याची निर्मिती केली असून संदर्भीय क्र. १ वरील महसूल व वन विभागाच्या दिनांक ३१/०७/२०१४ च्या शासन निर्णयान्वये पालघर जिल्हाधिकारी कार्यालयासाठी १०२ अस्थायी पदांचा आकृतीबंध मंजुर केला आहे. पालघर जिल्हाधिकारी कार्यालय हे दि.०१/०८/२०१४ रोजी अस्तित्वात आल्याने सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात त्यासाठी अर्थसंकल्पित तरतूद केली नव्हती. त्यामुळे नवनिर्मित पालघर जिल्हाधिकारी कार्यालयाच्या वेतन, कार्यालयीन खर्च, इंधन खर्च, दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क व इतर अनुषंगिक बाबीकरीता सन २०१४ च्या हिवाळी अधिवेशनातील पुरवणी मागणीद्वारे योजनेतर “२०५३-जिल्हा प्रशासन” या लेखाशिर्षाखाली रुपये २१५.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय:-**

नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता “मागणी क्र.१, २०५३-जिल्हा प्रशासन (००) (०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्वसाधारण आस्थापना (०१) (०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८)” या लेखाशिर्षाखाली पूरक मागणीद्वारे प्राप्त झालेली रुपये २१५.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी पंधरा लक्ष फक्त ) या रकमेतून खालील नमूद केलेल्या उद्दीष्टासाठी खालील तक्त्यात रकाना क्र. ४ मध्ये दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.**<br>**(१)** | **बाब क्र.**<br>**(२)** | **अर्थसंकल्पित केलेला निधी (रुपये)**<br>**(३)** | **या आदेशान्वये वितरीत केलेला निधी ( रुपये )**<br>**(४)** |
|---|---|---|---|
| १. | ०१-वेतन | १,५१,००,०००/- | १,५१,००,०००/- |
| २. | ०३ अतिकालीन भत्ता | ५०,०००/- | ४०,०००/- |
| ३. | ०६-दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ५,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४. | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | ५,००,०००/- | ४,००,०००/- |
| ५. | १३-कार्यालयीन खर्च | ४०,००,०००/- | ३२,००,०००/- |
| ६. | १७-संगणक खर्च | ३,००,०००/- | २,४०,०००/- |
| ७. | २४-पेट्रोल, तेल व वंघन खर्च | ४,५०,०००/- | ४,५०,०००/- |
| ८. | ५१-मोटार वाहने | ६,००,०००/- | ४,८०,०००/- |
| | **एकूण-** | **२,१५,००,०००/-** | **२,०४,१०,०००/-** |

( अक्षरी रुपये दोन कोटी चार लाख दहा हजार फक्त )

२. सदरहू निधीच्या वितरणामध्ये व खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, परिपत्रक क्र. पूरक-२०१४/प्र. क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि.०१/०१/२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४३/२०१५/व्यय-९ , दिनांक ३१/०१/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०६१३३४१२६५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.02.12 16:49:02 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२) जिल्हाधिकारी, पालघर.
३ ) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
४) प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५) कक्ष अधिकारी, व्यय-९ / कोषाप्र-५ / वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
७) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मुंबई- ४०० ००५.